तेथ वर्णवपु निर्दोष! मिरवितसे!' (श्रीज्ञानदेवांचे गणेश वंदन भाग ४)

भगवान श्रीगणेशांच्या ओंकार स्वरूप निर्गुण निराकार स्वरूपाचा ठाम विचार मांडल्यावर कनवाळू माऊली श्रींच्या सगुण साकार रूपाचा विचार करते सर्वसामान्य साधकांना समोर सगुण साकार आलंबन असल्याशिवाय साधना करताच येत नाही. त्यांच्या याच मर्यादेचे भान ठेवन माऊलीचे मातृहृदय अवतरीत होते आणि निर्गुणत्वाला विशद केल्यावर साधना सुलभतेसाठी त्याच निर्गुणाचे सगुण रूप शब्दबद्ध करते.

मात्र हे सगुन वर्णन सामान्य नाही. आपल्या सारखे नाक, कान, डोळ्यांचे बाह्य वर्णन नाही. वर्णन तर सगुणाचे आहे. मात्र ते करत असतानाही निर्गुणत्वाला धक्का लागत नाही. 'मूर्तीचे' वर्णन तर घडते पण 'अमूर्ताला' किंचित ही अवकळा येत नाही याला म्हणतात माऊलींचे वर्णन. आपल्या या वर्णनारंभी माऊली म्हणते-

हे शब्दब्रह्म अशेष! तेची मूर्ती सुवेष!
तेथ वर्णवपु निर्दोष! मिरवीत असे!

माऊलींच्या लेखी अशेष 'शब्दब्रह्म' हीच मोरयाची मूर्ती आहे. शब्दब्रह्म म्हणजे वेद, उपनिषदे, पुराणे, शास्त्रे या सगळ्यांना श्रींचे शरीर म्हटले. का? तर शरीर हे दृश्य असते. मूर्त असते, तसे वेदातील शब्द दृश्य आहेत. शब्द दृश्य असतात पण ते दिसत असले तरी महत्व कशाला असते? तर अर्थाला. अर्थ कळला तर शब्दांची गरजच नसते. नुसत्या वटारल्या डोळ्यांनी वा बोटांच्या हालचालीनेही आपण मनातील भावना पोहचवू शकतो. तेथे शब्दांची गरजच नसते. शब्दोच्चार न करू शकणारे बालकही हास्यातून स्वीकार वा रुदानातून नकार कळवतच असते की. तात्पर्य शब्द दिसत असले तरी महत्व आहे अर्थाला. तसे वेदादिकांचे शब्द आहेत शरीर. दिसते शरीर पण महत्व असते जीवाला. नदवत वेदादिक शास्त्रांच्या अध्ययनात महत्व आहे मोरयाला जाणण्याला. त्या जाणण्याचा मार्ग आहे वेद. अत: ते शरीर.

कसे आहेत हे शब्द? तर- निर्दोष. अदोष मोरयाचे शरीरही निर्दोषच हवे. हे शब्द निर्दोष आहेत. हे वर्णन मोठे चिंतनीय आहे. बोलणे आले की बोलणारा आलाच. शब्द आले की उच्चारण कर्ता आलाच. असा कोणी वक्ता आला की मग त्याचे गुणदोषही आलेच. त्याची बौद्धिक मर्यादाही आलीच. त्याच्या स्वार्थभावाची अनिवार्यताही आलीच. पण या शब्दात तसे नाही.
व्यावहारिक वचनातील हे दोष वेदवचनांना लागू पडत नाहीत. कारण आपली वचने हे पुरुषाचे म्हणून पौरुषेय असतात पण वेदवचन अपौरुषेय आहे. अत: त्यात व्यक्तिगत दोषांना स्थान नाही. ते निर्दोष आहेत. कारण ते 'परमसत्य' आहेत.

'ऋतं वच्मि! सत्यं वच्मि!' ही प्रतिज्ञा असणारी शास्त्रवाणी ही श्रीगणराज प्रभूंची 'मूर्ती' आहे. एखाद्याच्या चित्राकडे पाहिले की आपल्याला 'त्या' ची आठवण येते. कारण चित्र मूर्ती हे 'त्या' चे दिग्दर्शन करीत असते. त्याप्रमाणे वेदवाड.मय माझ्या मोरयाचेच कथन करतात म्हणून ते 'वपु' रूप ठरतात. सामान्य व्यक्तीचे कथनार्थ सामान्य घटक चालतात पण वर्णन परब्रह्माचे निदर्शन करते ते ही 'शब्दब्रह्मच'.

'शब्दब्रह्म' असणारी वेदवाणी हेच श्रीगणराजांचे शरीर होय. मोरयाची ही वपु मिरवत आहे.
'मिरवणे' शब्दही मोठा सुंदर आहे. 'मिरवणूक' काढण्यात हे मिरवणे असते. आपण मोरयाची मिरवणूक काढतो अर्थात त्याच्या सौंदर्याचे, वैभवाचे, ऐश्वर्याचे, क्षमतांचे भव्यतम प्रदर्शन करतो. विविध प्रकारे श्रींच्या मूर्तीला रथाला, समूहाला इतकेच काय मार्गालाही सजवत असतो.

मात्र थोडा विचार करा या सगळ्या सजावटीची गरज कोणासाठी? श्रींसाठी की आपल्यासाठी? तर निर्विवाद रीत्या आपल्याच साठी या सगळ्याच्या 'असण्या' वा 'नसण्या' चा मोरयाला काहीच फरक पडत नाही. मात्र या सगळ्याच्या द्वारे आपल्या मनात त्याची प्रीती अधिकाधिक दृढ होते.
हाच हिशोब आहे मोरयाच्या शब्दरूप शरीराचा. त्या शरीराने वर्णिलेल्या सगळ्या वैभवाचे आपणास विलोभन घडते. त्याचसाठी ही वर्णवपु 'मिरवत' असते.

अर्थात हे मिरवणेही सामान्य भौतिक अलंकाराचे नाही. जसे शरीर दिव्य तसेच त्यांचे अलंकारही दिव्यच. काय आहेत हे अलंकार? माऊलींचे शब्द आहेत-

हे शब्दब्रह्म अशेष! तेचि मूर्ती सुवेष!
तेथ वर्णवपु निर्दोष! मिरवत असे!
स्मृती तेचि अवयव! देखा आंगिकभाव!
तेथ लावण्याची ठेव! अर्थशोभा!
अष्टादश पुराणे! तेचि मणिभूषणे!
पदपद्धती खेवणे! प्रमेय रत्नांची!
पदबंध नागर! तेचि रंगाथिले अंबर!
जेथ साहित्यवाणे सपूर उजाळाचे!
देखा काव्य नाटक! जे निर्धारिता स कौतुक!
त्याची रूणक्षुणनी क्षुद्रघंटिका अर्थध्वनी!
नाना प्रेमयांची परी! निपुणपणे पाहता कुसरी!
दिसती उचित पदे माझारी रात्नेभली!
तेथे व्यासादिकांची मती! तेचि मेखला मिरविती!
चोखाळपणे झळकती! पल्लव सडका!

काय अदभूत वर्णन आहे हे, स्मृती हेच अवयव, अर्थशोभा हे लावण्य पुराणे ही मणिभूषणे, पदपद्धती रत्नांचे कोंदण, शब्दरचना हे वस्त्र, काव्यनाटके इ. क्षुद्रघंटिका इथपासून तर व्यासादिकांची मती ही कंबरपट्टा.

प्रत्येक कथनाला समजून घ्यायला एकेक लेखही अपुरा पडावा असे हे कथन. कां म्हटले असेल या सगळ्यांना अशी आभूषणे? काय काय साम्य आहे त्यांच्या संरचनेत. पुढील लेखात अभ्यासू. तोवर जय गणेश!